रोजगार प्रोत्साहन कार्यक्रमांतर्गत प्रलंबित विद्यावेतनाच्या देयकास मंजूरी देण्याबाबत जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र पुणे.

# महाराष्ट्र शासन
## कौशल्य विकास व उदयोजकता विभाग
## शासन निर्णय क्रमांक : कौविउ-२०१८/प्र.क्र.१०९/रोस्वरो-१

२ रा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : ०४ डिसेंबर, २०१९

वाचा :- संचालनालयाचे पत्र क्रमांक: कौविरोव उसं/लेखा-६/४७२१, दिनांक.२४ जून, २०१९.

**शासन निर्णय-**

जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र पुणे यांनी सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे यांची माहे जुलै, सप्टेंबर, आणि नोव्हेंबर - २०१५ या कालावधीतील रोजगार प्रोत्साहन कार्यक्रम योजनेअंतर्गत ऑनलाईन पध्दतीने नोंदविलेल्या व मागणी केलेल्या प्रशिक्षणार्थीच्या विद्यावेतन प्रतिपूर्तीची रक्कम रु.५३,५४६/- (रुपये त्रेपन्न हजार पाचशे शेहेचाळीस फक्त) अदा करण्यास शासन निर्णय क्रमांक:विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दिनांक १७/०४/२०१५ मधील नियम पुस्तिका भाग-१, मधील अ.क्र. ६ नियम क्र. ४० मधील अटी व शर्तींच्या अधिन राहून मंजुरी देण्यात येत आहे.

२. सदर मंजूरी शासन निर्णय क्रमांक:विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दिनांक १७/०४/२०१५ मधील नियम पुस्तिका भाग-१, मधील अ.क्र. ६ नियम क्र. ४० अन्वये शासकीय कर्मचा-याच्या दाव्या व्यतिरिक्त शासनाकडुन देय असलेल्या दाव्यांचे प्रदान करण्याच्या अनुषंगाने देय असलेंल्या दिनांकानंतर १ वर्षाच्या आत कोषागाराकडे प्रशासकीय कारणास्तव दाखल न केलेले असे रु. ५०००/- च्या वरील दाव्यांना मंजुरी देण्याचे प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये मंजुरी देण्यात येत आहे.

३. या निमित होणारा खर्च लेखाशिर्ष २२३० ११०७ (३४) विद्यावेतन व शिष्यवृत्तीतून सन २०१९-२० या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२०४१२३१०३१२०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Suvarna Siddharth Kharat
Date: 2019.12.04 12:34:01 +05'30'

**( डॉ. सुवर्णा सि. खरात )**
शासनाच्या सह सचिव

**प्रत:**

१) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई. (सहाय्यक संचालक, जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र पुणे यांच्या मुळ कागदपत्रासह).

२) उप संचालक, जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, ४८१, रास्ता पेठ, पुणे,

३) जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र, पुणे

४) महालेखापाल - महाराष्ट्र -१, मुंबई,

५) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे

६) मुख्य लेखा परीक्षक, मुंबई,